**शासकीय व इतर कार्यालयांमध्ये**
**<u>वाहनांच्या वापरासंबंधीचे धोरण</u>**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग, मंत्रालय**
**मुंबई - ४०० ०३२**
**शासन निर्णय, क्रमांक - वाहन-२०१०/प्र.क्र.५०/१०/विनियम**
**दिनांक:१० जानेवारी, २०११**

**वाचा:-** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.९.२००१

<u>प्रस्तावना</u> :- संदर्भाधिन शासन निर्णयान्वये शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापरासंबंधीचे धोरण निश्चित केले आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार संदर्भाधिन शासन निर्णयासोबतच्या "जोडपत्र-अ" मध्ये सर्व प्रशासकीय विभाग(खुद्द) व त्यांच्या अखत्यारितील विभागीय/दुय्यम कार्यालयांतील वाहनांचा आढावा घेऊन निर्लेखित वाहनांऐवजी नवीन वाहने खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे आवश्यक आहे. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, अद्यापही बहुसंख्य विभागांनी त्यांचा व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतील वाहनांचा एकत्रित आढावा घेतलेला नाही. तसेच वाहन खरेदीसाठी राज्यस्तरीय वाहन आढावा समितीची मान्यता प्राप्त झाल्यानंतर वाहन खरेदीसाठी तरतूद उपलब्ध नसल्याने पुन्हा निधी उपलब्धतेसाठी वित्त विभागाकडे प्रस्ताव सादर केले जातात. तरी शासकीय वाहनांच्या खरेदीबाबतची प्रक्रिया सुलभ होण्याच्या दृष्टीकोनातून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

<u>निर्णय</u>

शासकीय वाहन खरेदीच्या अनुषंगाने <u>खालीलप्रमाणे मार्गदर्शक तत्वे</u> विहित करण्यात येत असून सदर बाबींच्या पूर्ततेसह प्रशासकीय विभागांकडून, राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेस्तव वित्त विभागाकडे प्रस्ताव सादर करण्यात यावेत.

(१) सर्व प्रशासकीय विभागांनी (खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतील वाहनांचा वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयानुसार वाहन आढावा घेणे आवश्यक आहे.

(२) ज्या प्रशासकीय विभागांचा वाहन आढावा पूर्ण झालेला नसेल अशा प्रशासकीय विभागांना याबाबतच्या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ६ महिन्यांकरिता राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेशिवाय, त्यांच्या अधिपत्याखालील निर्लेखित वाहनांच्या एकूण संख्येच्या ७०% मर्यादेपर्यंत नवीन वाहने खरेदी करण्यास प्रायोगिक तत्वावर परवानगी राहील. तसेच सदर कालावधीत वाहन आढावा पूर्ण करण्याची दखल संबंधित प्रशासकीय विभागांनी घेणे आवश्यक आहे.

(३) नवीन वाहन खरेदी करण्यापूर्वी अर्थसंकल्पात पुरेशी तरतूद उपलब्ध असणे आवश्यक आहे.

(४) वाहन निर्लेखित झाल्यानंतर त्या वाहनाचा पुन्हा वापर करता येणार नाही.

(५) वाहन चालकाचे पद मंजूर /उपलब्ध असणे आवश्यक आहे.

(६) वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयान्वये कोणत्याही कारणास्तव रिक्त झालेली वाहन चालकांची पदे भरण्याबाबत असलेले निर्बंध शिथिल करण्यात येत आहेत. यानुषंगाने रिक्त होणारे वाहन चालकाचे पद भरण्यापूर्वी अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे मागणी करणे आवश्यक राहील. अतिरिक्त संवर्ग कक्षाकडून वाहन चालक प्राप्त न झाल्यास, पदांच्या आकृतीबंधानुसार वाहन चालकांच्या मंजूर पदांच्या मर्यादेत रिक्त झालेले वाहन चालकाचे पद भरण्यास प्रत्यवाय राहणार नाही. मात्र, पद-

भरतींच्या संदर्भातील वेळोवेळी वित्त विभाग(वित्तीय सुधारणा) तसेच सामान्य प्रशासन विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णयांतील तरतूदींचे अनुपालन करणे आवश्यक राहील.

(७) शासकीय अधिका-यांच्या पदांच्या कर्तव्याच्या अनुषंगाने वाहने अनुज्ञेय करण्यात येत असून ज्या पदावरील अधिका-यांच्या वापरातील ज्या प्रकारचे वाहन (जीप/कार) निर्लेखित करण्यात आले असेल, त्या वाहनाऐवजी त्याच पदांकरिता व त्याच प्रकारचे वाहन खरेदी करता येईल.

(८) वाहन खरेदीचे प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेस्तव चक्रीय पध्दतीने सादर करण्यात येतील.

२. हे आदेश सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.ln या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०१११५२०४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुधीर श्रीवास्तव)
प्रधान सचिव (वित्त)

प्रति,

- ◆१. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई २०
- ◆२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई २०
- ◆३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
- ◆४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
- ५. राज्यपालांचे सचिव
- ६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
- ७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
- ८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
- ९. सर्व आमदार
- १०. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
- ११. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग
- १२. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
- १३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
- १४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
- १५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
- १६. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
- ◆१७. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
- ◆१८. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
- ◆१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
- ◆२०. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- ◆२१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
- ◆२२. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
- ◆२३. प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४००० ०५१
- २४. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
- २५. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
- २६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
- २७. सर्व उप कोषागार अधिकारी
- २८. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
- २९. सर्व विभागीय आयुक्त
- ३०. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- ३१. सर्व जिल्हाधिकारी
- ३२. महाराष्ट्र राज्य महिला आयोग, गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोटमाळा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५
- ३३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
- ३४. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
- ३५. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
- ३६. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
- ३७. बहूजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
- ३८. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०,
- ३९. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४
- ४०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
- ४१. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५
- ४२. नॅशनलीस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री पेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-२१
- ४३. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८,
- ४४. वित्त विभागातील सर्व कार्यासने
- ४५. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

---